**मुख्यमंत्री कृषि व अन्न प्रक्रिया योजना सन २०२३-२४ मध्ये राबविण्यास रू. ३०००.०० लाख निधी वितरणास मान्यता देणेबाबत.** (२४०१ A७९१)

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मस्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्र. मुअप्र-२०२३/प्र.क्र.१३२/९-अे**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.
तारीख:- २८ जुलै, २०२३

वाचा-

१. कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र.राअअ-१११६/प्र.क्र. २४८/१४अे, दि. २० जून, २०१७
२. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२३/प्र.क्र. ४०/अर्थ-३, दि. १२ एप्रिल, २०२३
३. कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र.मुअयो-२०२३/प्र.क्र. १३२/९अे, दि. ११ मे, २०२३
४. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे जा. क्र./मुकृवअप्रयो/१९७७०/२०२३, दि. १३.०६.२०२३
५. कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र.मुअयो-२०२३/प्र.क्र. १३२/९अे, दि. १९ जून, २०२३

**प्रस्तावना :-**

मुख्यमंत्री कृषि व अन्न प्रक्रिया योजना सन २०२३-२४ मध्ये राज्यात राबविण्याकरिता उपरोक्त वाचा येथील दि. ११.०५.२०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये रू. १००००.०० लाख एवढया रकमेच्या कार्यक्रमास प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. आयुक्त (कृषि) यांनी उपरोक्त वाचा येथील दि. १३.०६.२०२३ रोजीच्या पत्रान्वये रु. ४९५७.०० लाख एवढा निधी उपलब्ध करुन देण्याची विनंती केली आहे. उक्त विनंतीस अनुलक्षून रु. १०००.०० लाख एवढा निधी उपरोक्त वाचा येथील दि. १९.०६.२०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये आयुक्त (कृषि) यांना वितरीत केला आहे. उर्वरित निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती, त्याबाबत शासन आता पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :-**

मुख्यमंत्री कृषि व अन्न प्रक्रिया योजना सन २०२३-२४ मध्ये राज्यात राबविण्याकरिता रू. ३०००.०० लाख (रूपये तीस कोटी फक्त) एवढा निधी आयुक्त (कृषि) यांना वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. चालू वर्षी या योजनेअंतर्गत निधी उपलब्ध करुन दिल्यानंतर तो प्रथमत: प्रलंबित प्रकरणांसाठी वापरण्यात यावा. प्रलंबित प्रकरणे निकाली निघाल्यानंतर उर्वरित निधी सन २०२३-२४ मधील पात्र प्रकल्पांसाठी वापरावा.

३. संदर्भांकित शासन निर्णय दि. २०/०६/२०१७ व दि. ११/०५/२०२३ अन्वये विहित केलेल्या तरतुदींनुसार सदर योजनेची अंमलबजावणी करण्यात यावी व त्यानुषंगाने योजना सन

२०२३-२४ मध्ये राबविण्याकरिता मार्गदर्शक सूचना कृषि आयुक्तालय स्तरावरून निर्गमित कराव्यात.

४. सदर योजना सन २०२३-२४ मध्ये राबविण्याकरिता आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रक अधिकारी तर सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. सदर योजनेसाठी उपलब्ध होणारा अर्थसंकल्पीत निधी पुढील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा

मागणी क्र. डी-३,
२४०१-पीक संवर्धन,
(००)(१०२) अन्नधान्य पीके,
(००)(३४) मुख्यमंत्री कृषी व अन्न प्रक्रिया योजना (१००% राज्य योजना)
(२४०१ A ७९१)
३३, अर्थसहाय्य

६. राज्य शासनाने विहीत केलेले नियम/सुचनांचे पालन करून लेखापरिक्षण करून निधी वितरणाचे उपयोगिता प्रमाणपत्र राज्य शासनास सादर करावे.

७. सदर आदेश, नियोजन विभागाचा अनौ. संदर्भ क्र. ३०८/का. १४३१, दि. १०.०७.२०२३ व वित्त विभागाचा अनौ. संदर्भ क्र. १९५/२०२३/व्यय-१, दि. २०.०७.२०२३ अन्वये त्या विभागाने दिलेल्या सहमतीनुसार तसेच वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक: अर्थसं.-२०२३/प्र.क्र.४०/ अर्थ-३, दिनांक १२ एप्रिल, २०२३ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२३०७२८१८३०५५६५०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने.

HEMANT
GORAKHNATH
MHAPANKAR

Digitally signed by HEMANT GORAKHNATH MHAPANKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=1775f5c28a439e88c4c15ab3f88d6a6beb26ad2675a8c7a7ff397b2e5305303d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=6756123D309547BB1E152A6AEB6042BDE4040836DF541FD3620CA87FF8E71CC5, cn=HEMANT GORAKHNATH MHAPANKAR
Date: 2023.07.28 18:33:20 +05'30'

**( हे. गो. म्हापणकर )**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई-३२.

२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई-३२.
३) मा. मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
४) मा. मंत्री (फलोत्पादन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
५) मा. विरोधीपक्षनेते, विधानपरिषद, विधानमंडळ, मुंबई.
६) मा. विरोधीपक्षनेते, विधानसभा, विधानमंडळ, मुंबई.
७) मा. विधान परिषद/विधानसभा सदस्य, विधानमंडळ सचिवाल, मुंबई.
८) मा. मुख्य सचिव यांचे स्विय सहाय्यक.
९) अपर मुख्य सचिव (कृषि) यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक, कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
१०) आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य पुणे.
११) संचालक (कृषि प्रक्रिया व नियोजन), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१२) सर्व विभागीय कृषि सहसंचालक, महाराष्ट्र राज्य.
१३) सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी, महाराष्ट्र राज्य.
१४) सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१५) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरिक्षण)-१/२, मुंबई/नागपूर.
१६) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
१७) संचालक, लेखा व कोषागार अधिकारी, मुंबई (२ प्रती)
१८) सहसंचालक, लेखा व कोषागारे संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, ५ वा मजला, मुंबई.
१९) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी, महाराष्ट्र राज्य.
२०) माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई - ३२
२१) कक्ष अधिकारी (का.१४३१), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
२२) कक्ष अधिकारी (अर्थ.-१३/ व्यय-१), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
२३) कक्ष अधिकारी (२-अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
२४) निवड नस्ती-९अे.